**श्री क्षेत्र परळी वैजनाथ ज्योतिर्लिंग तीर्थक्षेत्र विकास आराखड्यातील कामांसाठी रु.८.०० कोटी इतका निधी जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे वितरीत करण्याबाबत.**



**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : पूरक-२०२३/प्र.क्र. ३६७/नवि-१७**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक:- २७ मार्च, २०२५.**

**वाचा :-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: एमयुएम-२०१८/प्र.क्र.३४३/नवि-१७, दि.१५.०१.२०१९.

२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: एमयुएम-२०२३/प्र.क्र.२७६/नवि-१७, दि.०८.११.२०२३.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: पूरक-२०२३/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.१९.१२.२०२३.

४) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.पूरक-२०२३/प्र.क.३६७/नवि-१७, दि.२३.०२.२०२४.

५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

६) जिल्हाधिकारी, बीड यांचे पत्र क्र.२०२४/जिबी/डेस्क-१/एमयुएन, दि.१३.०९.२०२४.

७) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.पूरक-२०२३/प्र.क.३६७/नवि-१७, दि.१५.१०.२०२४.

८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५.

**प्रस्तावना:-**

श्री क्षेत्र परळी-वैजनाथ ज्योतिर्लिंग, जि.बीड या तीर्थक्षेत्र विकासाच्या रु.२८६.६८ कोटी इतक्या किंमतीच्या आराखड्यास दि.०८ नोव्हेंबर, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर आराखड्यातील कामांसाठी “श्री क्षेत्र परळी-वैजनाथ ज्योतिर्लिंग तिर्थक्षेत्र विकास आराखडा (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (२२१७ A२५२)” या लेखाशिर्षाअंतर्गत रु.३०.०० कोटी इतका निधी दि.२३ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये संबंधित स्वतंत्र लेखाशिर्ष २२१७ ए २५२ अंतर्गत वितरित करण्यात आला आहे.

सदर आराखड्यातील कामांसाठी आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये “श्री क्षेत्र परळी-वैजनाथ ज्योतिर्लिंग तीर्थक्षेत्र विकास आराखडा (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (२२१७ A२५२)” या लेखाशिर्षाअंतर्गत रु.२०.०० कोटी फक्त इतका नियतव्यय मंजूर असून अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

सदर आराखड्यातील कामांसाठी जिल्हाधिकारी, बीड यांनी रु.७३.६० कोटी इतक्या निधीची मागणी केली असून वर्ष २०२४-२५ करीताच्या रुपये २०.०० कोटी अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी एकूण रु.१२.०० कोटी इतका निधी नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेनुसार संदर्भाधीन क्र.७ येथील शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे वितरीत करण्यात आला आहे. वर्ष २०२४-२५ साठी अर्थसंकल्पीत रक्कम रुपये २०.०० कोटी पैकी दि.१५ नोव्हेंबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला रु.१२.०० कोटी इतका निधी वजा जाता उर्वरित रु.८,००,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी) इतका निधी वितरित करण्याबाबतचा प्रस्ताव नियोजन व वित्त विभागास मान्यतेस्तव सादर करण्यात आला होता. श्री क्षेत्र परळी-वैजनाथ ज्योतिर्लिंग तिर्थक्षेत्र विकास आराखड्यातील कामांसाठी रु.८,००,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी) इतका निधी वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार सदर आराखड्यातील कामांसाठी रु.८,००,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी) इतका निधी जिल्हाधिकारी, बीड यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

बीड जिल्ह्यातील श्री क्षेत्र परळी वैजनाथ ज्योतिर्लिंग तीर्थक्षेत्र विकास आराखड्यातील कामांकरीता सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पीत तरतूदीमधील शिल्लक रु.८,००,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी) इतका निधी जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे वितरीत करण्यास आणि सदर आराखड्यातील कामांकरीता उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांना वितरीत करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, बीड यांच्यावर सोपविण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. शासन निर्णय, दि.०८ नोव्हेंबर, २०२३ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या अटी व शर्ती कायम राहतील.
२. सदर आराखड्यातील कामांसाठीचा खर्च नगर विकास विभागाच्या लेखाशीर्षांतर्गत "मागणी क्रमांक एफ-२, मुख्यलेखाशीर्ष-२२१७, नगरविकास, १९२-नगरपरिषदांना सहाय्य (००) (८३) श्री क्षेत्र परळी-वैजनाथ ज्योतिर्लिंग तिर्थक्षेत्र विकास आराखडा (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (२२१७ A२५२)" या लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.
३. सदर निधी आहरीत करुन कार्यान्वयीन यंत्रणा-परळी-वैजनाथ नगरपरिषदेला वितरीत करण्यासाठी जिल्हाधिकारी, बीड यांना नियंत्रक अधिकारी, तसेच जिल्हा प्रशासन अधिकारी/सह आयुक्त,

नगरपरिषद प्रशासन शाखा, जिल्हाधिकारी कार्यालय, बीड यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. शासन निर्णय, दि.०८ नोव्हेंबर, २०२३ मधील अटी व शर्तीनुसार वितरीत रु.८,००,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी) कोटीमधून कामांच्या अंदाजपत्रकांना सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी किंवा घेण्यात आल्याची खात्री करावी व त्यानंतर संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेला निधी वितरणाची कार्यवाही जिल्हाधिकारी, बीड यांनी करावी.

५. सदर निधी ज्या कामासाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच कामासाठी वापरण्याची दक्षता घ्यावी. तसेच योजनेसंदर्भात निधीच्या खर्चाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे विहित कालमर्यादेत शासनास सादर करावीत.

६. जिल्हाधिकारी, बीड यांनी शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ व क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५ मधील विहित अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करावी.

७. आहरण व संवितरण अधिकाऱ्याने सदर आहरीत करण्यात येणारा निधी कार्यान्वयीन यंत्रणा-परळी-वैजनाथ नगरपरिषदेस तात्काळ वितरीत करावा. सदरचा निधी दि. ३१ मार्च, २०२५ अखेर खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांच्याकडील अनौपचारीक संदर्भ क्र.अनौ.क्र.९०/२०२५/का.१४४४, दि.२७ फेब्रुवारी, २०२५ तसेच वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्याकडील अनौपचारीक संदर्भ क्र.१२१/२०२५/व्यय-३, दि.१३ मार्च, २०२५ यांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२७१४४०५७६७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.03.27 14:42:25 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. उप मुख्यमंत्री तथा मा.मंत्री, नगर विकास व गृह निर्माण यांचे प्रधान सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री तथा मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे प्रधान सचिव.
४. मा. पालकमंत्री, बीड यांचे खाजगी सचिव.
५. अपर मुख्य सचिव, वित्त/नियोजन/सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
७. विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
८. जिल्हाधिकारी, बीड.
९. उप सचिव (नवि-१६)/(नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. मुख्याधिकारी, परळी-वैजनाथ नगरपरिषद, परळी, जि. बीड.
११. निवडनस्ती (नवि-१७).